उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील
कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक
(गट-ब) या पदाच्या सन २०२० मधील
नियतकालिक बदल्यांबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बदली-२०२०/प्र.क्र.६६/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०१ ऑक्टोबर, २०२०

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ३(१) मध्ये विहीत केलेल्या तरतूदीस अनुसरुन उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/ प्रबंधक (गट-ब) या संवर्गातील ज्या कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक अधिकाऱ्यांचा कालावधी बदल्यांच्या अधिनियमातील कलम ३(१) मध्ये विहित केलेल्या कालावधीपेक्षा जास्त झालेला आहे त्यांची खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे परिणामस्वरूपत: (Resultant) बदली करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदनांम | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | बदलीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. एम. के. ठोंबरे | अधिक्षक | सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड | सहसंचालक, उच्च शिक्षण, औरंगाबाद | प्रशासकीय |
| २ | श्री. किरण माने | प्रबंधक | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर | सहसंचालक, उच्च शिक्षण, कोल्हापूर | प्रशासकीय |

२. प्रशासकीय कारणास्तव बदली झालेल्या कनिष्ठ प्रशासन अधिकारी/ अधिक्षक/ प्रबंधक यांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहिल.

३. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मंजूरीने सदर बदल्या करण्यात येत आहेत.

४. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ होण्याकरीता संबंधित कार्यालय प्रमुखांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. आदेश तात्काळ अंमलात येतील.
२. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेल्या कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक यांच्या जागी पर्यायी कनिष्ठ प्रशासन अधिकारी/ अधिक्षक/ प्रबंधक हजर होण्याची वाट न पाहता संबंधित कार्यालय प्रमुखांनी बदली झालेल्या कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक यांना बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक यांनी सध्या कार्यरत असलेल्या

कार्यालयातून त्यांची बदली नंतरची पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

३. बदली झालेले कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक यांनी संबंधित कार्यालयामधून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक यांना रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षा काळ ठरुन काम न करता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित कार्यालय प्रमुखांना जबाबदार धरण्यात येईल.

४. पदस्थापनेत बदल करण्यासंबधीच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक यांनी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक हे शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

५. बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

६. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे तसेच सदर आदेश तात्काळ अंमलात येत असल्याने बदली झालेल्या कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक यांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंतचे अथवा जास्तीत जास्त दिनांक १५ ऑक्टोबर, २०२० पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाने काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या कार्यालयाकडून काढण्यात येऊ नये. सदर वेतन संबंधित कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर बदलीनंतरच्या कार्यालयाने काढावे. दिनांक १६ ऑक्टोबर, २०२० पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.

७. बदली झालेल्या कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची जबाबदारी वैयक्तिकरित्या सबंधित विभाग प्रमुख यांची राहील. याबाबतचा कार्यपालन अहवाल संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी दिनांक १६ ऑक्टोबर, २०२० पूर्वी शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२०१००११८३४३०५६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANISHA PRAVIN KINI

Digitally signed by MANISHA PRAVIN KINI
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, serialNumber=be59abce2e8b3a2f8b88d3cb21bee92fd81e2ed85d5357c0a88629268305fca7, cn=MANISHA PRAVIN KINI
Date: 2020.10.01 18:37:55 +05'30'

(म. प्र. किणी)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण

३. सर्व प्राचार्य, शासकीय महाविद्यालये/संस्था

४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी यांची कार्यालये

७. संबंधित कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक

८. निवड नस्ती.

**प्रत** :- १. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.

२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.